**पंतप्रधान अनुदान प्रकल्पांतर्गत बांधलेल्या इमारतींच्या दुरूस्तीसाठी महाराष्ट्र निवारा निधीतून निधी उपलब्ध करून देणेबाबत...**

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/अनौ.सं.क्र.३४/प्र.क्र.१२२/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २९ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र. नानिफं २००८/प्र.क्र.२१३/ गृनिधो-२, दिनांक ३१.०५.२०१०.
२. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांचे क्र. जा.क्र.मुअ/निकाअ/पीएमजीपी/न.क्र.GEN-१०७/7234/दुवपु-२०२४, दिनांक ०८.०८.२०२४

**प्रस्तावना:-**

पंतप्रधान अनुदान प्रकल्पांतर्गत केंद्र सरकारने सन १९८८ मध्ये उपलब्ध करुन दिलेल्या निधीअंतर्गत मुंबई शहरातील २६९ उपकर प्राप्त इमारतींमधील ४८८१ निवासी ३६२ अनिवासी असे एकूण ५२४३ गाळयांची पुनर्रचना करुन सन १९८९ ते १९९४ या कालावधीत ६६ पुनर्रचित इमारती बांधण्यात आल्या. या इमारतीमध्ये ५७०८ निवासी ५९७ अनिवासी असे एकूण ६३०५ गाळे बांधण्यात आले आहेत व हे गाळे मूळ भाडेकरूंना जानेवारी १९८९ पासून जानेवारी १९९५ च्या दरम्यान मालकी हक्कांवर वितरीत केले.

सदर इमारती जवळजवळ ३० वर्ष जुन्या असून, सध्या या इमारतींची अवस्था अतिशय खराब झालेली आहे. आर्थिक परिस्थितीमुळे रहिवाश्यांना त्यांच्या इमारतींची दैनंदिन देखभाल व दुरुस्ती करता येत नसल्यामुळे त्यांच्या सुरक्षिततेस धोका निर्माण झालेला आहे. तसेच, सदर इमारतींच्या दुरूस्ती/पुनर्विकासासाठी गृहनिर्माण विभागाची कोणतीही योजना उपलब्ध नाही. तसेच, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळाकडे सदर बाबीसाठी कोणताही निधी उपलब्ध नाही. तसेच, सदर जीर्ण इमारतींच्या दुरूस्तीकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबत विविध लोकप्रतिनिधीमार्फत केली जाणारी मागणी विचारात घेता पंतप्रधान अनुदान प्रकाल्पांतर्गत बांधलेल्या इमारतींच्या दुरूस्ती करीता विशेष बाब म्हणून रूपये १५० कोटी इतका निधी महाराष्ट्र निवारा निधीमधून उपलब्ध करून देण्याबाबत म्हाडा प्राधिकरणाने शासनास विनंती केली होती. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. पंतप्रधान अनुदान प्रकल्पांतर्गत साधारणत: ३० वर्षापूर्वी बांधण्यात आलेल्या एकूण ६६ इमारतींपैकी “ए” विभागातील विजयदिप इमारत व “सी” विभागातील समता, सागर व परिक्षम या चार इमारतींच्या दुरुस्तीकरीता रुपये १२.५० कोटी व उर्वरीत ६२ इमारतींच्या दुरुस्तीकरीता रुपये १३७.५० कोटी असा एकूण रुपये १५० कोटी (अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र निवारा निधीतून उपलब्ध करुन देण्यास यान्वये एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येते.

२. उपरोक्त ६६ इमारतींची दुरुस्ती मंजूर निधीतून करण्यात यावी. त्यासाठी यापुढे महाराष्ट्र निवारा निधीतून कोणताही अतिरिक्त निधी मंजूर केला जाणार नाही.

३. उपरोक्त खर्चाबाबत मुख्य अधिकारी, इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, वांद्रे, मुंबई यांनी आवश्यक तपशील वेळोवेळी म्हाडा प्राधिकरणास सादर करावा. तसेच, महाराष्ट्र निवारा निधीचा आवश्यक लेखा, अंमलबजावणी यंत्रणा म्हणून म्हाडा प्राधिकरणाने ठेवावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०८२९१८०९३६१००९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJU GULABRAO AMBADEKAR

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=b0ca117db55046daef08cffda987ea722840725027a3993410ac98c4bff99fbc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A0EE20C9BC84D1B68846640737AE7DE6E57C4DDDB08701C0FA67003815071B38, cn=RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2024.08.29 18:24:23 +05'30'

**( राजू अंबाडेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति :

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई .
२) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे, मुंबई.
३) मुख्य अधिकारी, इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, वांद्रे, मुंबई.
४) मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
५) मा. मंत्री, गृहनिर्माण, मंत्रालय यांचे खाजगी सचिव.
६) अवर सचिव, दुवपू -१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती - गृनिधो -२